प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी
पुणे विभाग यांना कार्यालयीन कामकाजासाठी
नवीन दूरध्वनी मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग

शासन निर्णयक्रमांकः प्रविचौ १२१०/९०९/११-अ

मंत्रालय,मुंबई-३२. दिनांकः- १९ जूलै,२०१०.

वाचाः-(१) शासन निर्णय सा.प्र.वि.क्र.एसपीओ-२८०७/प्र.क्र.२१/०७/११-अ,
दि.२८.१०.२००९.

(२) शासन निर्णय सा.प्र.वि. प्रविचौ-१२०९/प्र.क्र.१४६/०९/११-अ,
दि.३१.१२.२००९.

(३) शासन निर्णय सा.प्र.वि. टी ई एल-१०.००/प्र.क्र.३६/२०००/२२,
दि.२७.०९.२०००.

(४) विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे यांचे पत्र क्र.सा.प्र./३/ आरआर/१५४७/ २०१०,
दि.०३.०७.२०१०.

**शासन निर्णयः-** शासन सेवेतील गट-अ व गट-ब (राजपत्रित) दर्जाच्या अधिकाऱ्यांची चौकशी प्रकरणे हाताळण्यासाठी महसूल विभागीय स्तरावर ६ प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकाऱ्यांची पदे संदर्भ क्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आलेली आहेत. तसेच विभागीय चौकशीची प्रकरणे हाताळण्यासाठी प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी पदावर बदलीने संदर्भ क्रमांक (२) येथील शासन निर्णयान्वये नियुक्त्या करण्यात आलेल्या आहेत. त्या अनुषंगाने प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी,पुणे यांचे कार्यालय सुरू झाले असून कार्यालयीन कामकाज सुलभतेने पार पाडण्यासाठी सदर कार्यालयात एक नवीन दूरध्वनी सुरू करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. शासकीय कार्यालयीन दूरध्वनीच्या वापराबाबत शासनाने सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्र.टीईएल-१०००/प्र.क्र.३६/२०००/२२,दि.२७.९.२००० अन्वये घालून दिलेल्या नियमांचे काटेकोर पालन करण्यात यावे. दूरध्वनीचा वापर काटकसरीने व केवळ शासकीय कामाकरीताच करण्यात यावा. दूरध्वनीबाबतची देयके विहित मुदतीत प्रदान करण्याची तसेच देयके वेळीच प्राप्त न झाल्यास संबंधित दूरध्वनी कार्यालयाकडून डुप्लीकेट देयके प्राप्त करून घेवून ती विहित मुदतीत प्रदान करण्याची दक्षता घेण्यात यावी.दूरध्वनी वापराबाबतच्या सर्व नोंदी वेळीच नोंदवाव्यात. तसेच दूरध्वनी देयकाबाबत स्वतंत्र नोंदवहया ठेवण्यात याव्यात.

३. यासाठी येणारा खर्च सामान्य प्रशासन विभाग मागणी क्र."ए-४,२०५२, सचिवालय-सर्वसाधारण सेवा (०९२) इतर कार्यालये (०२) विभागीय चौकशी करीता विशेष अधिकारी (०२) (०२) पुणे विभाग (२०५२०२९५) १३ कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली सन २०१०-११ साठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांकः-विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम दि.१५ मे,२००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८,भाग पहिला,उप विभाग-दोन मधील अ.क्र.१४व नियम क्र.६२ च्या तरतूदीन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार व प्रधान सचिव(सेवा) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला आहे. त्याचा संकेतांक क्रमांक :- २०१००७१९१९३११४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(चा.के.परांजपे)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

विभागीय आयुक्त,पुणे विभाग,पुणे.
प्रादेशिक चौकशी धिकारी,पुणे.
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुबई.
जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे.
कक्ष अधिकारी,का.२२ सा.प्र.वि.
निवड नस्ती